**राष्ट्रीय छात्रसेना, गट मुख्यालय, मुंबई-ब येथील कार्यालयीन इमारतीची दुरुस्ती करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र:- राछासे २६२१/प्र.क्र.६३/क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०७ सप्टेंबर, २०२१.

**वाचा :-**

प्र.सह संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.राछासे/इमारत व दुरुस्तीसाठी/२०२१-२२/का-५/५३९, दि. २५/०५/२०२१

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय छात्रसेना, गट मुख्यालय, मुंबई-ब येथील कार्यालयीन इमारतीची दुरुस्ती सार्वजनिक बांधकाम विभागाकडून तातडीने करून घेणेबाबत रू. २७,३३,८२०/- ( अक्षरी रूपये सत्तावीस लक्ष तेहत्तीस हजार आठशे वीस फक्त) इतक्या किंमतीचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्धतेसाठी संदर्भाधिन पत्रान्वये शासनास सादर झाले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०२०-२१ च्या दरसुचीवर आधारीत असून यामधील कामे कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई यांनी प्रमाणित केली आहेत. सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय छात्रसेना, गट मुख्यालय, मुंबई-ब येथील कार्यालयीन इमारतीच्या दुरुस्तीचे स्वरूप खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | कामाचे नांव | रक्कम |
|---|---|---|
| 1. | Repairs to Flooring, Partition, Storage unit, table chair and plaster and painting at Group Headquarter Mumbai (B) at N.C.C. Building, Mumbai. | Rs. 27,33,820/- |

राष्ट्रीय छात्रसेना, गट मुख्यालय, मुंबई-ब येथील कार्यालयीन इमारतीच्या दुरुस्तीकरीता अंदाजपत्रकाच्या एकूण रु. २७,३३,८२०/- (सत्तावीस लक्ष तेहत्तीस हजार आठशे वीस) इतक्या रकमेस खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. या कामांसाठी निविदा मागविण्याआधी सदर कामांकरीता सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजूरी घेणे आवश्यक राहील.
२. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत, काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
३. निधी मंजूर झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरूवात करण्यात येऊ नये.

२. सदर इमारत दुरुस्तीवरील खर्च खालील लेखाशिर्षातर्गंत सन २०२१-२२ च्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**मागणी क्र- ई** - ०४

४२०२ , शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यांवरील भांडवली खर्च,

०१, सर्वसाधारण शिक्षण,

२०२, माध्यमिक शिक्षण,

(००) (०४) शिक्षण उप संचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम

(४२०२६२२८) ५३ मोठी बांधकामे.

३. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उप विभाग-पाच मधील १३४ नुसार सार्वजनिक बांधकाम विभागाच्या परिरक्षणासाठी ताब्यात नसलेल्या इमारतीच्या सर्वसाधारण दुरुस्ती व विशेष दुरुस्तीस प्रशासकीय (वित्तीय मान्यता धरून) मान्यता व खर्चाला मंजूरी देण्याबाबत प्रशासनिक विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२१०९०७१७१४३८२३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2021.09.07 17:15:07 +05'30'

**( स्वा. म. नानल )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री, (क्रीडा व युवक कल्याण ) मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, (क्रीडा व युवक कल्याण ) मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
८. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्रसेना संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. ( संचालनालयामार्फत )
९. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई
१०. निवडनस्ती (क्रीयुसे-३).